# आजोबांचं नवलाईचं भिंग

लेखक: सॅम आणि बेरील एपस्टाईन

चित्रे: जिल अल्गीन



# आजोबांचं नवलाईचं भिंग

मराठी अनुवादः सुशील मेन्सन





आजोबा वृत्तपत्राचं वाचन करण्यास बसले.





मग त्यांनी आपल्या खिशातून काहीतरी काढलं.
“हे काय आहे, आजोबा?” जॉनीने विचारलं.
“ही माझी नवी काच आहे, वाचण्यासाठी,”
आजोबा म्हणाले. “याच्यामुळे माझ्या म्हाताऱ्या
डोळ्यांना बऱ्यापैकी स्पष्ट दिसतं.”
“पण हे काम कसं करतं?” कुतूहल वाटून
जेस्सीने विचारलं.

“या काचेतून अक्षरं मोठी दिसतात,” आजोबा तिला म्हणाले.
आजोबांनी काच एका शब्दावर धरली.
काचेतून पाहिल्यावर तो शब्द असा दिसला :




“व्वा!” जॉनी म्हणाला. “मीसुद्धा करून बघू, आजोबा? प्लीज?”
जॉनीने काच हातात घेतली आणि ती एका शब्दावर धरली.
काचेतून तो शब्द एवढा मोठा दिसू लागला :





“बघा!” जॉनी म्हणाला.
“या काचेतून माझा अंगठासुद्धा मोठा दिसतोय!”



“आता मी धरू काच माझ्या हातात, आजोबा?” जेस्सीने विचारलं. “प्लीज?”

जेस्सीनेसुद्धा ती काच
आपल्या अंगठ्यावर धरली.
काचेतून तिचा अंगठा हा
असा दिसू लागला :



मग तिने काच आजोबांच्या वृत्तपत्रावर
धरली.
तिने काच त्यातील एका चित्रावर नेली.
आणि तिला ते चित्र असं दिसू लागलं :







“हे चित्र पूर्ण काळं नाहीये!” जेस्सी म्हणाली.

“ते काळ्या काळ्या ठिपक्यांनी बनलंय!”

आजोबांनी आपली काच परत घेतली.

“ठिपके कुठे नाहीसे झाले, आजोबा?” जेस्सीने विचारलं.

आजोबा हसू लागले.

“ठिपके अजून तिथेच आहेत,” ते तिला म्हणाले.

“पण ते खूप लहान लहान आहेत. ते दिसण्यासाठी तुम्हाला ते मोठे करावे लागतील.”

“मोठं करायचं? म्हणजे?” जॉनीने विचारलं.

“तेच तर केलंत ना आता तुम्ही,” आजोबा म्हणाले.

“ही काच वस्तू मोठ्या करून दाखवतं. माझी ही काच म्हणजे एक भिंग आहे.”



“माझ्याकडे असं एक भिंग असतं तर!” जॉनी म्हणाला.
“माझ्याकडेपण असं एक भिंग असतं तर!” जेस्सी म्हणाली.
“आता तुम्ही दोघं बाहेर खेळायला जा बघू. मला पेपर वाचायचाय,” आजोबा म्हणाले.









मग जॉनी आणि जेस्सी बाहेर
जाऊन गवतावर बसले.
“तुला काय वाटतं, गवत खरोखरच
हिरवं असतं का?” जेस्सीने विचारलं.
“की त्यावरसुद्धा हिरवे हिरवे ठिपके
असतात?”

जॉनी पट्‌कन उठला.
“आजोबा आपल्याला त्यांचं भिंग देतात का
बघू,” तो म्हणाला.
“मग आपल्याला शोधून काढता येईल!”
आजोबांना विचारायला ते घरात पळाले.



पण आजोबा त्यांना म्हणाले,
“त्यासाठी तुम्हाला भिंग वापरायची
गरज नाही.
मी तुम्हाला सांगू शकतो.
गवत खरोखरच हिरवं असतं.
आता तुम्ही दोघं बाहेर जाऊन खेळा.
मला पेपर वाचायचाय.”



जेस्सी आणि जॉनी पुन्हा बाहेर
गवतावर जाऊन बसले.
यावेळी ते थोडी बिस्किटं खाऊ
लागले.
“ती माशी बघ!” जेस्सी म्हणाली.
“नेमकं काय करतेय ती?
माझ्या बिस्किटाचा चुरा खातेय का?”

“आपल्याकडे एक भिंग असायला पाहिजे होतं,” जॉनी म्हणाला.

“कदाचित आजोबा थोड्या वेळासाठी देतील आपल्याला त्यांचं भिंग,” जेस्सी म्हणाली.





ते पुन्हा घरात पळाले.

“आजोबा,” जॉनी म्हणाला,

“एक माशी बसलीय गवतात. ती काय करतेय हे आम्हाला बघायचंय. प्लीज, तुमचं भिंग द्याल आम्हाला, एकदाच बघायला? प्लीज?”

“अच्छा, तुम्ही त्या माशीवर हेरगिरी करणार तर!” आजोबा म्हणाले.

“बरं, हे घ्या भिंग. पण लवकर परत आणून द्या.”



मग जॉनीने भिंग माशीवर धरलं.
जेस्सीनेसुद्धा त्यातून बघितलं.
त्यांना असं दृश्य दिसलं :



“ती माझ्या बिस्किटाचा चुरा खातेय,”
जेस्सी म्हणाली.
“मला तर माशीचा डोळासुद्धा
दिसतोय!” जॉनी म्हणाला.





“जॉनी! जेस्सी!”
आजोबांनी हाक दिली.
“माझं भिंग द्या पाहू मला”.
“हो आलो, आजोबा,” जॉनी म्हणाला.
“माशी बिस्किट खात होती!”
“व्वा, छान!” आजोबा म्हणाले.
“आणि आता मी पेपर वाचतो.
तुम्ही बाहेर जा
आणि खेळा.”





मग जेस्सीने हाक दिली, “जॉनी! इथे ये!
हे बघ!”
जेस्सी एका मधमाशीकडे बघत होती.
मधमाशी फुलावर बसली होती.





"मधमाशीसुद्धा खातेय का, काय वाटतं?"
तिने विचारलं.
"माझ्याकडे भिंग असतं तर बरं झालं
असतं," जॉनी म्हणाला.
"आपण आजोबांकडे भिंग मागू, फक्त एकदाच
बघायला."
मग ते पुन्हा घरात पळाले.

"आजोबा," जेस्सी म्हणाली.
"एक मधमाशी बसलीय फुलावर.
ती काय करतेय हे बघायचंय आम्हाला.
प्लीज, तुमचं भिंग द्याल,
फक्त एकदाच बघायला? प्लीज?" "

मधमाशी अजूनही त्या फुलावरच होती.
“बघ, जेस्सी,” जॉनी म्हणाला.
“फुलाकडे बघ.”
त्यांना भिंगातून असं दृश्य दिसलं :



“मला वाटतं, आज काही मला पेपर वाचायला मिळणार नाही,” आजोबा म्हणाले.
“हे घ्या भिंग.
तुमच्या मधमाशीला बघा.
मी थोडावेळ फिरून येतो.
पण लंचच्या वेळेला मला भिंग परत पाहिजे.”



मग मुलांनी मधमाशीकडे बघितलं.
मधमाशी काय काम करतेय, हे त्यांना
दिसू लागलं :



“अरे बापरे, या फुलावर तर खूप सारे
पिवळे कण आहेत!” जेस्सी म्हणाली.
“मधमाशीच्या पायांनासुद्धा हे पिवळे
कण चिकटलेयत!” जॉनी म्हणाला.
“काय करणार ती त्यांचं?



मग त्यांनी मधमाशीला पुन्हा भिंगातून पाहिलं.
त्यांना असं दृश्य दिसलं :





“मला मधमाशीचा गुडघा दिसतोय!” जॉनी म्हणाला.
“बघ तूसुद्धा!”
पण तेवढ्यात मधमाशी उडून गेली.



“लंचपर्यंत भिंग आपल्याचकडे असेल,”
जेस्सी म्हणाली.
“कदाचित माशी पुन्हा येईल थोड्या वेळाने.”
ते गवतात माशी शोधू लागले.
पण त्यांना काही ती सापडली नाही.
पण जॉनीला वेगळंच काहीतरी सापडलं.



“ही बघ मुंगी!” त्याने जेस्सीला हाक मारली.
त्यांनी भिंगातून मुंगीकडे पाहिले.



मुंगी एका छोट्याशा टेकाडावर चढत होती.
त्या टेकडीच्या वर
एक छोटं भोक होतं.
मुंगी त्या भोकातून खाली गेली.



“बघ!” जॉनी म्हणाला.
“पुन्हा बाहेर येतेय ती. हे भोक
म्हणजे तिच्या घराचं दार आहे.”
मुंगी टेकाडावरून खाली उतरली.
मग ती दूर निघून गेली.



भिंगातून त्यांना असं दृश्य दिसलं :



थोड्या वेळाने त्यांना मुंगी पुन्हा टेकडी चढताना दिसली.

“बघ, जॉनी,” जेस्सी म्हणाली.

“मुंगीच्या तोंडात बिस्किटाचा तुकडा आहे!
काय करणार ती या तुकड्याचं?”



मुंगी टेकडीवर चढून आपल्या घराच्या दरवाजात गेली.
तेवढ्यात तिचा बिस्किटचा तुकडा निसटून टेकडीवरून खाली पडला.
मुंगी पुन्हा खाली उतरली आणि बिस्किटचा तुकडा घेऊन पुन्हा टेकडी चढू लागली.
वर गेल्यावर पुन्हा बिस्किटचा तुकडा खाली पडला!



“काय बघताय तुम्ही दोघं?” आजोबांनी विचारलं.
“मुंगीला बिस्किटचा तुकडा तिच्या घरात नेऊन ठेवायचाय,” जेस्सी म्हणाली.
“तुम्ही पण बघा, आजोबा!”
मग आजोबासुद्धा खाली बसून बघू लागले.



“काय बघताय तुम्ही सगळे?” आईने विचारलं.

“लंचची वेळ झालीय!”

“अगं आई,” जेस्सी म्हणाली. “हे बघ आधी! मुंगी पुन्हा टेकडीवर चढू लागलीय!”

मग आईसुद्धा खाली बसून बघू लागली.



त्यांनी मुंगीला बिस्किटचा तुकडा टेकडीवर नेताना पाहिलं.

यावेळी ती बिस्किटचा तुकडा थेट आपल्या घरात घेऊन गेली.

“आजोबा,” जॉनी म्हणाला.
“प्लीज, लंचनंतर आम्हाला भिंग द्याल का पुन्हा?”
“प्लीज, आजोबा?” जेस्सी म्हणाली.
“आम्हाला आणखी मुंग्या बघायच्या आहेत.”





“शाब्बास!” जॉनी म्हणाला.
“यावेळी मुंगीने करून दाखवलं. आता ती लंच घेऊ शकेल!”
मग आई म्हणाली,
“आणि आपणसुद्धा आपला लंच घेऊ. चला बरं!”



“नाही,” आजोबा म्हणाले.
“आता पुन्हा भिंग मिळणार नाही तुम्हाला. मला गरज लागेल त्याची.”
जेस्सीला फार वाईट वाटलं.
जॉनीलासुद्धा!
“फक्त एकदाच द्या ना बघायला, आजोबा?” तो काकुळतीला येऊन म्हणाला.
“नाही,” आजोबा म्हणाले.



मग सगळे जेवायला बसले.
तेवढ्यात जेस्सीला टेबलवर तिच्यासाठी आणलेला एक खोका दिसला.
जॉनीलाही त्याच्यासाठी आणलेला एक खोका दिसला.

“चला, उघडा त्यांना,”

आजोबा म्हणाले.





जॉनीने आपला खोका उघडला.

**भिंग!**

“अरे व्वा!” जॉनी म्हणाला. “किती मस्त!”



जेस्सीनेसुद्धा आपला खोका उघडला.

**भिंग!**

“किती छान, आजोबा!” जेस्सी म्हणाली.



आनंदाने त्यांनी आजोबांना मिठी मारली.

“आई!” जेस्सी म्हणाली. “आता आम्ही तुला माशीचा डोळा दाखवू शकतो!”

“आणि मधमाशीचा गुडघासुद्धा!” जॉनी म्हणाला.



“चला, आता मी शांतपणे माझा पेपर वाचू शकतो!” आजोबा म्हणाले.

समाप्त